# पुनर्जन्माचे अनेक अदभूत अनुभव

## डार्विनचा उत्क्रांतिवादी सिद्धांत खरा आहे काय ? भाग १०

## E Book 175

लेखक - प्राचार्य अद्वयानंद गळतगे भोज-५९१ २६३
जि. बेळगाव (कर्नाटक ) भ्र. ९९०२००२५८५.

१) पूर्वजन्मातील बंगाली गाणी म्हणणारी स्वर्णलता मिश्रा- मध्यप्रदेशातील छत्तरपूर जिल्ह्याच्या ठिकाणी शिक्षण

खात्यात असिस्टंट इन्स्पेक्टर असलेल्या श्री. एस. एल. मिश्रा यांची २ मार्च १९४८ रोजी जन्मलेली स्वर्णलता ही मुलगी साडेतीन वर्षांची झाल्यानंतर आपल्या मागच्या जन्माच्या गोष्टी बोलू लागली. तिने सांगितले की ती कटनी या शहरातील पाठक कुटुंबाची असून तिचे नाव बिया होते. कटनीतील घराचेही तिने तपशीलवार वर्णन केले. इतके अचूक की पुनर्जन्म संशोधक एच्. एन. बॅनर्जी यांना कटनी येथे त्या वर्णनाबरहुकम ते घर सहज सापडले. तिने एकूण नऊ विधाने केली होती. ती सर्व पाठक कुटुंबाला बरोबर लागू होत असल्याचे बॅनर्जींना आढळून आले, तिलोरा नावाच्या खेड्यातील एका लग्नासाठी अग्निहोत्री नावाच्या बाईबरोबर ती (बिया) गेली असता त्यांना शौचालय शोधण्यात अडचण आली होती, ही एक विशिष्ट घटनाही तिने सांगितली. कटनीच्या अग्निहोत्री बाईने ती घटना खरी असल्याचे म्हणून तिला नंतर

दुजोरा दिला. बिया घशाच्या रोगाने वारल्याचे तिने (स्वर्णलताने) सांगितले. बियाला घशाचा त्रास झाला होता हे खरे होते, पण हृद् रोगाने ती नंतर वारली होती. (वीरसिंगनेही अगोदरच्या एका घटनेची नंतरच्या आपल्या मृत्यूच्या कारणाशी अशीच गलत केली होती. पूर्वजन्म आठवणाऱ्या इतरही काही व्यक्तींच्या प्रकरणात अशीच गल्लत मृत्यूच्या बाबतीत केली गेल्याचे आढळून येते)

नंतर कटनीतील बियाच्या माहेरचे पाठक कुटुंबातील लोक व कटनीच्या उत्तरेला असलेल्या मैहर या गावातील तिच्या सासरचे लोक छत्तरपूरला एस. एल. मिश्रा यांच्या घरी आले. या लोकामध्ये काही अनोळखी व्यक्तींना मुद्दाम सामिल करून घेण्यात आले होते. अनोळखी व्यक्तींना स्वर्णलता ओळखू शकली नाही. पण बाकीच्या सर्व लोकांना तिने बरोबर ओळखले. चिंतामणी पांडे या मागच्या जन्मातील आपल्या (बियाच्या) नवऱ्याला ओळखताना हिंदू स्त्रिया जशा नवऱ्यासमोर वागतात तशी स्वर्णलता लाजाळूपणाने वागली. बियाने आपल्या पेटीत ठेवलेले १२०० रूपये चिंतामणीने घेतल्याची घटना, जी फक्त बिया व चिंतामणी या दोघानाच माहित होती, तिचा स्वर्णलत्ताने उल्लेख केला. ती खरी असल्याचे चिंतामणीने म्हटले. नंतर स्वर्णलताला कटनी व मैहर येथे नेण्यात आले, तेथे आपल्या पूर्वजन्माच्या नात्यातील सर्व लोकांना (भाऊ, बहीण, मुले इ. ) तिने बरोबर ओळखले. नोकरीणबाईलाही 'ही माझी नोकर बाई' म्हटले. एकूण स्त्रीपुरुष व मुले यांना धरून <u>वीस व्यक्तीना</u> तिने बरोबर ओळखले आहे. शिवाय घरात कोणते बदल केले होते ते बदलही तिने बरोबर. सांगितले. बिया १९३९ साली वारली, व स्नेहलता १९४८ साली जन्मली. बियाचा मृत्यू व स्वर्णलताचा जन्म यामध्ये ९ वर्षाचा काळ लोटला होता. <u>या काळात तिचा आसाममधील सिल्हेट शहरात जन्म झाला असल्याचे तिने सांगितले.</u> हा जन्म कमलेश नावाच्या मुलीच्या रूपाने झाला व नवव्या वर्षी तिचा मृत्यू होऊन मिश्रा कुटुंबात स्वर्णलता म्हणून आपण जन्मल्याचे तिने म्हटले आहे.आसाममधील सिल्हट शहर फाळणीनंतर बंगलादेशात गेले असून त्या शहरातील तिच्या त्या जन्माची खातरजमा करणे शक्य झालेले नाही तथापि तो तिचा मधल्या काळातील जन्म खरा असल्याबद्दलचा पुरावा आढळून आला आहे. हा

पुरावा म्हणजे ती पाच वर्षाची असताना आपल्या कुटुंबियांना बंगाली गाणे म्हणत नृत्य करुन दाखवले होते, सिल्हेट आसाममध्ये असल्यामुळे मिश्रा कुटुंबीय ते गाणे आसामी भाषेतील असावे असे समजत होते. नंतर स्वर्णलताने बंगालचे पुनर्जन्म संशोधक प्रा. पाल यांच्यापुढे त्यांना लिहून घेता यावे म्हणून  तीन वेळा तेच गाणे म्हणत नृत्य केले घेणे (तिला स्वतंत्रपणे गाणे म्हणता येत नव्हते. नृत्य करीतच ती ते गाणे म्हणू शकत होती) एकूण तीन गाणी ती म्हणत असे. प्रा. पालना संशोधनाअंती आढळून आले की त्यातील दोन गाणी ही रवीन्द्रनाथ टागोरांची शांतिनिकेतन मधील पीक काढताना म्हणावयाची (सुगीची) बंगाली गाणी आहेत. तिसरे दुसऱ्या कुणाचे तरी बंगाली गाणे आहे. स्वर्णलता म्हणाली की ती सिल्हेटमधील मधु नावाच्या मुलीकडून ती गाणी व नृत्य शिकली. सिल्हेटमध्ये बंगाली भाषिक कुटुंबे आहेत. मधु ही मुलगी शांतिनिकेतनमध्ये ती गाणी व नृत्य शिकली असणे शक्य आहे. नंतर १९७१ साली एम्. एस्. सी, केलेल्या २३ वर्षाच्या स्नेहलताने स्टिव्हन्सनसाठी यांच्याही पुढे ती गाणी म्हणत नृत्य करून दाखवले. प्रा. पालनी स्टिव्हन्सनसाठी  तिन्ही गाण्यांचे इंग्रजीत भाषांतर  केले आहे. स्वर्णलताला बंगाली भाषा कळत नव्हती असे पाल यांना आढळून आले आहे. म्हणजे तिचे बंगाली गाणे केवळ पाठांतर केलेले नृत्यगायन होते. पण मृत्यूची सीमा ओलांडून पुनर्जन्मात ते तिच्या बरोबर आले होते. अतींद्रिय विज्ञानात याला इंग्रजीत  'रिसिटेटिव्ह झेनोग्लॉसी ' म्हणतात) ( Twenty Cases Suggestive of Reincarnation Ian Stevenson, 1974)



Home > Reincarnation Cases > Swarnalata Reincarnation Case

## Swarnalata Remembers

By Dr. K.S. Rawat
World famous researcher Ian Stevenson, in his landmark book, 20 cases suggestive of reincarnation, told the story of Swarnalata Mishra, the daughter of a school inspector in India, whom he interviewed in 1961, when she was 13. Dr. Stevenson told how Swarnalata, at age three, went on a trip with her father to the city of Jabalpur, and on the way home "unexpectedly asked the driver of the truck they were in to turn down a road toward 'my house' "in the city of Katni, where they stopped for tea. Katni is about 100 miles from their home city of Panna.

२. एका स्त्रीला दोन नवऱ्यापासून मुले झाली आहेत, ज्यापैकी दुसरा नवरा पाहिल्या नवऱ्याचा पुनर्जन्म झालेला नवरा आहे!

माउंग अये क्याव - माउंग अये क्यावचा जन्म १८ मे १९५२ रोजी उत्तर ब्रह्मदेश (आताचे म्यानमार) मधील तादा-ऊ या लहान शहराजवळील उ-यिन्-ख्बा या खेड्यात उ-ओह्ल-खिन् (बाप) व दाव यी (आई) यांच्या पोटी झाला. त्याच्या डाव्या कानाच्या वर डोक्याला जन्मतःच एका मोठ्या जखमेची खूण होती. (त्या गोष्टीचा येथे मुद्दाम उल्लेख करण्याचे कारण जन्मतःच आढळणारी एकादी जखमेची खूण त्या व्यक्तीला मागच्या जन्मात झालेल्या जखमेमुळे निर्माण झालेली असते. आनुवंशिक किंवा मातेच्या गर्भाशयातील परिस्थितीच्या कारणामुळे नसते. त्यामुळे त्या व्यक्तीचा पुनर्जन्म

झाल्याचा तो पुरावा ठरतो) तो ३ ते ४ वर्षांचा असताना उ-यिन-ख्वा या त्याच्या गावात भाजी विकायला आलेली एक बाई तादा-उ या जवळच्या मोठ्या गावातून आली आहे असे समजताच तिला तो भेटून म्हणाला, "मी तुझ्याबरोबर तादा-उ ला  येतो" . तिने त्याला" कशासाठी?" असे विचारता तो म्हणाला, "माझे आई-वडील तेथे आहेत." "कोण तुझे आईवडील? " असे तिने त्याला विचारले असता त्याने "उ-तोके व दाव-अये-सेदून" असे उत्तर दिले व "मी त्यांचा मुलगा माउंग श्वे आहे" असे तो म्हणाला. तिने तादा- ऊ शहरात परत गेल्यावर त्याच्या पुनर्जन्माची माहिती पसरवली, ती बातमी माउंग-अउंग-खिन या माउंग श्रे या खून झालेल्या व्यक्तीच्या धाकट्या भावाच्या कानावर गेली, व तो उन-यिन्-ख्वा या खेड्यात माउंग-अये-क्याव याला भेटायला आला. त्याला पाहताच माउंग-अये-क्यावने त्याला ओळखले व पळत जाउन त्याला मिठी मारली. माउंग-अउंग-खिन् ने मग त्याला माउंग-श्वेच्या कुटुंबाविषयी माहिती विचारली, ती त्याने इतकी अचूक सांगितली की त्यामुळे आपल्या खून झालेल्या थोरल्या भावाचाच -माउंग-श्वे चाच माउंग अये क्यावच्या रूपाने पुनर्जन्म झाला असल्याची त्याची पूर्ण खात्री झाली.




या घटनेच्या काही दिवसानंतर  त्याला तादा-उ या गावाला नेण्यात आले, त्याने आपला खून डोक्यात गोळी घालून करण्यात आला असल्याची माहिती दिली. आपले

लग्न मा-ह् ला-म्यीने हिच्याशी झाल्याचेही सांगितले. ब्रह्मदेशातील पुनर्जन्म संशोधक उ विन माउंग यांनी माउंग अये क्यावने सांगितलेल्या सर्व गोष्टींची तपशीलवार नोंद केली असून त्याची व स्टिव्हेन्सन यांच्यासह त्या दोघानी मिळवलेल्या पुराव्यासकटची माहिती थोडक्यात अशी -

माउंग श्र्वे चा जन्म तादा-उ या गावात १९३१ साली झाला. त्याचे पालक उतोके दाव व अये सेदून हे होते.



Gaung Gwe Pagoda

अठरा वर्षांचा झाल्यानंतर माउंग श्वेने तादा-उ शहरा जवळील गाउंग ग्वे या खेड्यातील सोळा वर्षांच्या मा हला म्यीने या मुलीशी लग्न केले. नंतर तो पोलीसात भर्ती झाला. ब्रह्मदेश ब्रिटिशापासून स्वतंत्र झाल्यानंतर कम्युनिस्टांनी उठाव केला होता. १९५२ साली तादा ऊ शहर त्यांनी काबीज केले. ते काबीज करण्यापूर्वीची १९५१ सालची ही घटना आहे. त्या साली माउंग श्र्वे व आणखी एक पोलीस पांथय पुलावर पहारा करीत होते. सोबतीचा तो पोलीस काही कामा निमित्त दूर गेला होता. अशा वेळी त्याच्या ओळखीची दोन माणसे त्याला भेटली व गाउंग ग्वे खेडयातील लोकांना त्रास देत असलेल्या काही डाकूंना शोधण्यास आपणास मदत करण्यासाठी त्याला विनविले. वास्तविक ते बंडखोर कम्युनिस्ट होते. पण हे त्याला माहित नव्हते. त्यांच्यावर विश्वास

ठेवून माउंग श्वे ने आपली रायफल  काखेला मारून त्यांच्याबरोबर तो निघाला. अर्ध्या मैलावरील एका उथळ ओढ्यातून जात असताना त्याच्या पाठीमागच्या माणसाने त्याच्या मानेत सुरा खुपसला. तो मेला असे ते समजले. पण तो बेशुध्द झाला होता, त्याला तो पहारा करीत असलेल्या पूलाजवळ ओढत आणले. तेथे तो शुध्दीवर आला व कण्हला. त्या बरोबर त्यातील एकाने त्याचीच रायफल घेऊन त्याच्या डोक्यात गोळी झाडली. (त्याचाच जखमेची खूण पुनर्जन्मात माउंग अये क्यावच्या डोक्यात जन्मतःच आढळून आली असून त्यामुळे आपला मृत्यू झाल्याची आपण आठवण तादा-उ त्याने, वर उल्लेख  केल्याप्रमाणे, सांगितली.) नंतर त्यांनी त्याचे प्रेत पाण्यात फेकून दिले.

हा सर्व घटनाक्रम सांगून माउंग अये क्याव पुढे म्हणाला, 'पाण्याच्या प्रवाहाबरोबर वाहत असलेल्या आपल्या प्रेताबरोबर मी विदेही (लिंगदेही) स्वरूपात जाऊ लागलो. दुस-या दिवशी सकाळी आपले प्रेत इरावदी नदीच्या काठावरील उ-यिन-य् वा या खेड्यात नेऊ-या जवळ तटाला अडकले. पाणी भरण्यासाठी आलेल्या आपल्या (या जन्मातील) आईने (दाव यी हिने) तटाला पाण्यात तरंगत असलेले माझे प्रेत पाहून मोठयाने किंचाळली. ते ऐकून तेथे लोक धाऊन आले. व ते प्रेत काठीने नदीच्या प्रवाहात ढकलून दिले. <u>तेव्हा मी तिचा घागरा पकडून तिच्याबरोबर विदेही स्वरूपात उन्-यिना गावात आलो. गावात प्रवेश करताना गावाचे रक्षण करणारे काही विदेही व्यक्तींनी (आत्म्यांना) मला आडविले. पण मी त्यांना न जुमानता जबरीने गावात घुसलो</u>,"

पुढे माउंग अये क्यावने म्हटले आहे की मृत्यू नंतर फक्त एक दिवस आपण अशा रीतीने विदेही (लिंगदेही)  स्वरूपात  होतो. पण विदेही (अभौतिक) जगातील व्यक्तीची भौतिक कालन गणना कित्येकदा चुकीची ठरू शकते. कारण माउंग श्वेच्या खुनाचा दिवस ३ जुलै १९५१ होता, व माउंग अये क्यावचा जन्मदिवस जन्म  प्रारंभी  त्यांनी सांगितल्याप्रमाणे १८ मे १९५२ हा होता. यात साडे दहा महिन्यांचे अंतर आढळून येते. <u>गरोदरपणाचे ९ महिने वजा जाता दीड महिने माउंग विदेही स्वरूपात होती असे ठरते.</u> म्हणजे दाव यीने माऊंग श्वे चे प्रेत पाहिल्यानंतर त्याला(माउँग अय क्याव-व्या रूपाने)

दीड महिन्यांनी ती गरोदर राहिली होती. (अशा रीतीने प्रेताशी संपर्कात आलेल्या स्त्रिया त्या प्रेताना विदेही व्यक्तीला गरोदर राहिल्याचे असेच प्रकार पुनर्जन्माच्या प्रकणात इतरत्र आढळून आले आहेत.)

माउंग अये क्यावने आपल्या मानेत सुरा खुपसणा-या व डोक्यात गोळी मारणाच्या दोन्ही व्यकींची नावे सांगितली आहेत, बालक असतानाच तो त्यांचा सूड घेण्याची भाषा करीत असे. एकदा त्या पैकी एकाला रस्त्यात दगड मारल्याचेही त्याने म्हटले आहे.

माउंग श्वे अशारीतीने अदृश्य (बेपत्ता) झाल्यानंतर त्याची पत्नी मा-ह्-ला-म्यीने आपल्या माहेरी, न्-गा-झूनला गेली. (मूळ गाउंग ग्वे  सोडून तिने माहेरचे कुटुंब एव्हाना न्-गा-झूनला स्थलांतरित झाले होते. आपला पती पुन्हा भेटेल अशी तिची मनोदेवता तिला सांगत होती. त्यामुळे तिने पुन्हा लग्न न करण्याचे ठरविले होते. पण घरच्या लोकांनी तिच्या इच्छेविरुध्द, सैनिक असलेल्या एका व्यक्तीशी तिचे लग्न जबरीने लावून दिले. यानंतर काही दिवसांनी माउंग श्वेचा माउंग अये क्यावच्या रूपाने उ-यिन्-य् वा या खेड्यात पुनर्जन्म झाल्याची बातमी तिला समजली व त्याला भेटण्याचे तिने ठरवले. तादा-उला एका लग्नसमारंभासाठी ती आली होती. तिथून ती जवळच असलेल्या उ-गिन्-य् वाला आली. माउंग अये क्याव घरी नव्हता. थोड्यावेळाने तो आला. त्या वेळी स्त्रियांच्या घोळक्यात बसली होती. पण तिला त्याने ओळखले व तिला मिठी मारून तो आनंदाने रडला. यावेळी त्याचे वय ७ ते ८ वर्षाचे होते.

यानंतर त्याचे वय वाढेल तसे मा हला म्यी नेची त्याला सारखी आठवण होऊ लागली होती. तो न्-गा-झून या तिच्या गावाला जाण्यासाठी पालकांना सारखा विचारू लागला पण त्यांनी त्याला परवानगी दिली नाही. त्याने नंतर प्राथमिक शिक्षण पूर्ण केले. अठरा वर्षांचा झाल्यानंतर त्याने केशभूषेचे दुकान काढले. दरम्यान मा हला म्यीनेचा सैनिक असलेला नवरा बंडखोर कम्युनिस्टांबरोबरच्या चकमकीत मारला गेल्याचे त्याला समजले. यावेळी तिलाही त्याची सारखी आठवण होत होती. एकदा न्-गा-झूनचे काही लोक उ-यिन -यवा गावात व्यापारासाठी आले होते.



Ngazun

ते मा-ह्-ला-म्यीनेला ओळखतात असे समजल्यावर माउंग-अये-क्यावने त्यांच्याकडे आपला एक फोटो तिला देण्यासाठी दिला. तेव्हा त्यानी तरूण मुली ऐवजी एका प्रौढ विधवे बरोबर संपर्क साधण्याच्या त्याच्या प्रयत्नाची खिल्ली उडविली. पण आपल्या मागच्या जन्मातील ती पत्नी असल्याचे त्याने त्यांना सांगताच ते आनंदाने तो फोटो तिला देण्याचे मान्य केले. थोड्याच दिवसात तो न्-गा-झूनला गेला. व तिच्याशी त्याने लग्न केले. <u>यावेळी त्याचे वय १९ वर्षाचे व मा-हला-म्यीने हिचे वय ३९ वर्षाचे होते.</u> पुनर्जन्म संशोधक उ-विन-माउंग व स्टिव्हेन्सन यानी १९७२ साली त्या जोडप्याची जेव्हा भेट घेतली तेव्हा त्यांचे लग्न होऊन एक-दोन वर्षे उलटली होती व त्यांना एक मूलही झाले होते. मागच्या जन्मात माउंग-श्वे चा (माउंग-अये -क्यावच्या पूर्वजन्मातील व्यक्तीचा) खून झाला तेव्हा मा-हला-म्यीने ला त्याच्यापासून एक मूल झाले होते व पुन्हा ती गरोदर होती. स्टिव्हेन्सननी म्हटले आहे की आपल्या पुनर्जन्म प्रकरणांच्या संशोधनात <u>हे असे एकमेव उदाहरण आहे की ज्यामध्ये एका स्त्रीला दोन नवऱ्यापासून मुले झाली आहेत, ज्यापैकी दुसरा नवरा पाहिल्या नवऱ्याचा पुनर्जन्म झालेला नवरा आहे.</u> जन्मोजन्मी टिकणाऱ्या वैवाहिक प्रेमाची ही अनोखी कहानी मन हेलावून

सोडणारी आहे असे त्यांनी शेवटी म्हटले आहे. या अनोख्या जोडप्याचा फोटो आपल्या या इति वृत्ताच्या शेवटी त्यांनी दिला आहे. ( Reincaternation and Biology, Vol.pp212-26, 1997)

३. माझा भाऊ तुझ्या पोटी जन्म घेणार असल्याचे तो या कृतीने सांगतो आहे.

माउंग सेइन् न्यूंत- माउंग सेईन न्यून हा मुलगा दक्षिण ब्रह्मदेहातील इन्सेइन् या गावी १८ नोव्हेंबर १९६७ रोजी जन्मला. त्याच्या वडिलांचे नाव उ-हला माउंग व आईचे नाव दाऊ- म्या- म्या होते. उला माउंग हे आपल्या समाजातील एक प्रमुख वकील होते. त्यांना उन-खिन-तिन नावाचा एक लहान भाऊ होता. जो आराकान मध्ये १९२६ साली जन्मला होता. व तोही एक वकील होता. एकदा रंगूनमधील मित्राच्या आमंत्रणावरून तो तेथे गेलेला असताना अंघोळीसाठी तेथील तलावात पोहत असताना हातापायाला एकाएकी पेटका आल्यामुळे मदत पोचण्याच्या आत बुडून मेला. ही घटना २० मार्च१९५६ रोजची. यावेळी त्याचे वय ३० वर्षांचे होते.



Insein Township

အင်းစိန်မြို့နယ်

सुमारे पंधरा महिन्यानंतर जुलै १९५७ मध्ये दाव- म्या-म्या ही पाच महिन्याची

गरोदर असताना कलकत्त्याला एका किरकोळ शस्त्रक्रियेसाठी आली होती. तेथे तिला सलग तीन रात्री एक स्वप्न पडले. रंगूनमध्ये तलावात बुडून मेलेला उ-खिन-तिन हा तिचा दीर स्वप्नात तिच्या बिछान्याच्या पायथ्याशी येऊन उभा राहत असे. हे स्वप्न इतके हुबेहुब होते की तिला त्या स्वप्नाची भिती वाटली. तिने ते स्वप्न आपल्या नवऱ्याला (उ-हला-माउंगला) सांगितले, तेव्हा तो म्हणाला, “माझा भाऊ तुझ्या पोटी जन्म घेणार असल्याचे तो या कृतीने सांगतो आहे. ”

प्रारंभी म्हटल्याप्रमाणे १८ नोव्हेंबर १९५७ रोजी माउंग-सेइन-न्यूंत जन्मला. जन्मल्या नंतर वडील उ-हुला-माउंग नी जन्मखुणासाठी त्याचे शरीर तपासले, तेव्हा उन-खिन-तिन या वकील असलेल्या आपल्या लहान भावाच्या पाठीवर ज्या ठिकाणी एक मोठा तीळ होता, तसाच तीळ माउंग सेइन न्यूंत च्या पाठीवर नेमके त्याच ठिकाणी त्यांना आढळून आला. उ-हला-



**Figure 9-25** Birthmark on the left upper back of Maung Sein Nyunt as it appeared in March 1977, when he was 19½ years old. The birthmark was an ovoid area of hyperpigmentation that was about 2.5 centimeters wide and 5 centimeters long.

माउंगना इतर दोन मुली होत्या, भाउ-बहीण होते. पण कुणाच्याही शरीरावर तसा तीळ

नव्हता म्हणजे ती जन्मखूण आनुवंशिक नव्हती, तर ती त्याच्या उन-खिन-तिन या वकील असलेल्या लहान भावाच्या पुनर्जन्माची ती खूण होती, याची वडील उ-हला-माउंग यांची खात्री झाली.

माउंग सेइन न्यूंत ला आई दाव म्या म्याने जवळ घेतले की तो रडत असे, वडील उ-हला-माउंग यांनी जवळ घेताच तो रडायचा थांबे. हा विचित्र प्रकार पाहून दाव-म्या-म्या च्या लक्षात आले की तिला आपल्या दिराचे स्वप्न पडले तेव्हा तो आपल्या पोटी जन्म घेऊ नये असे तिला वाटत होते. हेच त्याच्या रडण्याचे कारण असावे असे वाटून तिने त्याची क्षमा मागितली व `मी तूझे स्वागत करते' असे मोठ्याने त्याला म्हणाली व त्याला जवळ घेतले, आश्चर्य असे की तो लगेच रडायचा थांबला!

माउंग सेइन न्यूंत ला मागचा जन्म आठवत नव्हता. परिणामी त्याने त्या जन्माविषयी कसलीही विधाने केलेली नाहीत. त्याच्या पाठीवरील अद्बितीय जन्मखुणावरून व सलग तीन रात्री स्वप्नात त्याने दिलेल्या भेटीवरून तो उन-खि-तिन चाच पुनर्जन्म असल्याचे त्यानी मानले. शिवाय माउंग-सेईन -न्युंतला पाण्याची भीती वाटत असे,जी मागच्याजन्मी पाण्यात बुडून मेल्यामुळे निर्माण झाली होती.
(Reincaternation and Biology -

1. Stevenson. pp. 705-8)

४. लहानपणी बुलडोझर खाली सापडून मेलेला माउंग-विन-आउंग

माउंग विन् आउंग-

माउंग विन आउंग हा उत्तर ब्रह्मदेशातील प्याव-ब्वे या




Pyawbwe

शहराजवळील सार्दा-उंग नावाच्या एका लहान खेड्यात १९७७ साली जन्मला. त्याच्या बापाचे नाव उ-तिन् -माउंग व आईचे नाव दाव-यिन्. उ-तिन्- माउंग हा शेतमजूर होता. त्याची पत्नी दाव-यिन् हिने सांगितले आहे की आपण माउंग-विन-आउंगला गरोदर राहिल्याच्या एक महिन्यानंतर रात्री ९ च्या सुमारास आपण अर्धवट झोपेत  असताना २१ वर्षापूर्वी अपघातात वारलेला आपला बाप उ-सेइन आपल्या बिछान्यावर आपल्याजवळ भुताच्या स्वरूपात येऊन बसला व काही पैसे देत म्हणाला की 'मी तुझ्याकडे राहण्यास येत आहे'. (हे स्वप्न होते की खरोखर होते हे मी निश्चितपणे सांगून शकत नाही, असे तिने म्हटले आहे.) नऊ महिन्यानंतर माउंग-विन-आउंगला बाळंत झाल्यानंतर उ-सेइन् च  आपल्या पोटी माऊंग-विन्-आउंगच्या रूपाने जन्माला आल्याची तिची त्यामुळे खात्री झाली कारण ती आपल्या बापाच्या मृत्यूच्या वेळी सहा वर्षाची होती. तिने त्याचा अपघातात सापडलेला मृतदेह पाहिला होता. तेव्हा त्याच्या मृत शरीरावर तशाच स्वरूपाच्या त्याच ठिकाणी जखमा होत्या, हे तिने पाहिले होते.

माऊंग-विन्-आउंग दोन ते तीन वर्षाच्या दरम्यान बोलायला शिकल्यानंतर आपल्या आईला म्हणू लागला, “मी बन्ता या गावाला जाऊ इच्छितो” , तिने त्याचे कारण विचारता म्हणाला “मी बत्ता गावचा उ-सेइन आहे. नंतर त्याने आपण अपघातात

सापडून कसे मेलो हे तिला सांगितले. तो म्हणाला, "मी (पॅन केक) खात असताना दुकानदार व मी दोघेही कार खाली सापडून मेलो." असे म्हणून त्याने आपल्या शरीरावरील जखमांच्या खुणा तिला दाखवल्या. हे सर्व दाव-चिन् ला अर्थात माहित होते. वास्तविक तो कार खाली  सापडून नव्हे तर बुलडोझर खाली सापडून मेला होता. पण बुलडोझर हा शब्द अजून त्याला माहित झालेला नसल्यामुळे कार हा सर्वसामान्य शब्द त्याने वापरला होता. त्याच्या मृत्यूची ही घटना १९५६ सालची. त्या वर्षी आपल्या बत्ता या गावातून तो (उ-सेइन) यमेथिन या काही कि.मी. अंतरावरील शहरात फुले विकण्यासाठी जात होता (यमेथिन व प्याव्-बवे ही, शहरे रंगून-मंडाले महामार्ग व रेल्वे लाइनवर आहेत.) येमेचिनला गेल्यावर रस्त्यावरील एका स्टालवर पॅनकेक खाण्यासाठी तो थांबला. त्याच्याबरोबर त्याचा चुलतभाऊ उ-तेत-सेईन हा पोलीसात भर्ती होण्यासाठी येमेचिनला जात होता. पण तो न थांबला पुढे गेला होता. उ-सेइन पॅन केक खात असताना तो व पॅनकेक विकणारा यांना न पाहिल्यामुळे बुलडोझरच्या चालकाने त्या दोघांवर सरळ बुलडोझर घातला व त्याखाली सापडून दोघेही जागीच ठार झाले. काही लोक पळत जाऊन पुढे गेलेल्या उ-तेत-सेइन या त्याच्या




चुलत भावाला अपघाताची ही बातमी दिली. तेव्हा तो परत आला त्याला आला उ-सेईन चा  उजवा बाहू, उजवी पाठ बुलडोझरखाली  सापडल्याचे आढळून आले. <u>पुनर्जन्म झालेल्या माउंग-विन-आउंग च्या शरीराच्या याच भागावर गडद रंगाचे डाग जन्मत:च आढळून आले होते.</u> उ-तेत्-सेइनने त्याचे प्रेत बत्ता या गावी नेले व तेथे त्याचे दफन केले.

उ-सेइन अपघातात वारल्यानंतर दाव्-खिन्-यी या आपल्या पत्नीच्या स्वप्नात दोनतीन वेळा आला व तिला म्हणाला, “<u>मी आपल्या कुटुंबात जन्म घेऊ इच्छितो, पण मला येमेथिनमधील 'क्यी-नी' या तळ्याचा रखवालदार म्हणून नेमण्यात आले आहे” .</u> (तळी, गावे, पूल इत्यादीचे रक्षण करण्यासाठी मृतात्मे नेमले जातात असे ब्रह्मी समाजात मानले गेले आहे. महाभारतातील तळ्याचे रक्षण करणारा व पांडवाना प्रश्न

विचारणारा यक्ष येये आठवावा.) त्याच्या पत्नीने दुसरे लग्न केल्यानंतर मात्र तो तिच्या स्वप्नात जाण्याचा थांबला. उ-सेइन १९५६ साली वारला माउंग-विन-आउंग म्हणून आउंग १९७७ साली जन्मला. यामधे २१ वर्षांचे अंतर आहे. मृत्यू व पुनर्जन्म यामधील इतक प्रदीर्घ अंतर पुनर्जन्म प्रकरणात फारसे आढळून येत नाही. मेलेल्या उ-सेइन चा चुलतभाऊ, उ-तेत्-सेइन-जो उ-सेइन - जो उ-सेइन बरोबर येमेथिन गेला होता व ज्याने त्याचे प्रेत बत्ता ला आणून आणून दफन केले होते. त्याने माउंग-विन-आउंगला विचारले की "तू लवकर का जन्माला आला नाहीस?" तेव्हा तो म्हणाला, "मेल्यानंतर मला यमेथिन मधील तळ्याच्या रखवालदाराचे काम करावे लागले", मेल्यानंतर विदेशी स्वरूपातील उ-सेइन ने आपल्या पतीच्या स्वप्नात जाउन जे सांगितले होते. तेच पुनर्जन्म झाल्यानंतर माउंग-विन-आउंग च्या रूपाने येथे उ-तेत्-सेइन ला तो सांगत आहे. ही गोष्ट उलेखनीय आहे. बुलडोझर खाली सापडून मेल्यामुळे लहानपणी माउंग-विन-आउंगला बिननआउंगला सर्व तर्‍हेच्या मोटार वाहनांची भीति वाटत असे. (Reincarnation and Biology Ian Stevenson, pp. 665-671)

५. "माझ्या या जन्मातील दुर्दैवी परिस्थितीला केवळ मीच जबाबदार आहे. दुस-या व्यक्तीला (तिच्या बायकोला) माझ्यामुळे जे भोगावे लागले त्याची परतफेड मी या जन्मातील माझ्या भोगाने केलेली असल्यामुळे मी त्या व्यक्तीच्या ऋणातून आता मुक्त झाले आहे. पुढच्या जन्मी मला काही भोगावे लागणार नाही"

मा-म्यिंत-थेइन -

मा-म्यिंत-थेइन ही मुलगी उत्तर ब्रह्मदेशातील प्याव-ब्वे शहरा जवळील ओकिंगोने नावाच्या खेड्यात १२ ऑक्टोबर १९५६ रोजी जन्मली. तिच्या बापाचे नाव उ-पे-तिन् व आईचे नाव दाव-खिन्-ह्ला. उ-पे-तिन् हा शेती करीत होता. त्याची पत्नी दाव-खिन-ह्ला एक महिन्याची गरोदर असताना (हे तिला माहित नव्हते.नंतर ती गोष्ट आढळून आली) तिचा पती उ-पे-तिन् ह्याला एक स्वप्न पडले. त्याचा एक जवळचा मित्र उ-सेइन्-माउं




ग त्याच्या स्वप्नात येऊन त्याला म्हणाला, "मी तुमच्या घरी राहण्या साठी यावे म्हणतो," उ-पे- तिन् म्हणाला, “तुझी इच्छा असेल तर ये,” स्वप्नाच्या दुसऱ्याच दिवशी उ-पे-तिन् ला समजले की उ-सेइन- माउंग याचा तलवारीने खून करण्यात आला आहे. खूनाची ही घटना १९५६ च्या मार्च महिन्यातील शेवटच्या आठवड्यातील. प्रारंभी सांगितल्याप्रमाणे मा-म्यिंत-थेइन ही मुलगी १२ ऑक्टोबर १९५६ रोजी जन्मली, याचा अर्थ असा की उ-पे-तिन् ची पत्नी उ-सेइन-माउंग चा खून होण्याच्या एक महिन्यापूर्वीच त्याला (मा-म्यिंत-थेइन या मुलीच्या रूपाने) गरोदर राहिली होती. अशा प्रकारे एकाद्या व्यक्तीचा मृत्यू होण्यापूर्वीच त्या व्यक्तीला गरोदर राहण्याचा प्रकार अनेक पुनर्जन्म प्रकरणात आढळून

आले आहे. (मागच्या लेखात किर्पादेवीचे असलेच प्रकरण आपण पाहिले आहे. ) नऊ महिन्यानंतर मा-म्यिंत-थेइन जन्मली तेव्हा तिच्या दोन्ही हाताच्या आंगठ्याखेरीजची बोटे, काही अर्धी व काही पूर्ण तुरलेल्या स्वरूपात आढळून आली. तसेच पाठीवर व मानेवरही जन्मतःच जखमांच्या खुणा होत्या.



**Figure 24** Ma Myint Thein's hands as they appeared in February 1977, when she was 20 years old. All the fingers were markedly shortened and malformed. Most of the fingers and the right thumb showed constriction rings. Only the left thumb was completely normal.

ती पाच वर्षाची असताना इतर मुलांबरोबर खेळताना त्यांच्या बोटांच्या तुलनेत आपली तुटलेली बोटे पाहून एकाएकी तिला आपल्या पूर्वजन्माच्या घटना आठवल्या व आपल्या थोरल्या भावाला ती म्हणाली, “माझी एक बायको दक्षिणेत आहे. तिच्याकडे मला तू घेऊन गेलास तर तुला खायला बतासे देईन.” नंतर हळूहळू तिला मागच्या जन्माच्या सर्व गोष्टी आठवल्या व  तिने आपल्या कुटुंबियांना त्या सर्व सांगितल्या. त्या थोडक्यात अशा-

तिचे मागच्या जन्मातील नाव उ-सेइन-माउंग होते. तिच्या बायकोचे नाव मा-थेइन होते, (मागच्या जन्मात ती पुरूष असली तरी स्त्रीच्या रूपात तिचा पुनर्जन्म झालेला असल्यामुळे तिचे सर्व कथन करताना स्त्रीलिंगी सर्वनाम येथे वापरत आहे. त्या त्या प्रत्येक ठिकाणी पुरुष उ-सेइन-माउंग समजावा.) तिला दोन मुले होती. एक मुलगा व एक मुलगी. (त्यांचीही नाव तिने सांगितली आहेत.) तिची काही जनावरे होती. तिची एक सायकल व एक ट्रक होता. ट्रकमधून प्याव-ब्वेपासून पेगू व रंगूनपर्यंत भाजी व शेतमालाचा व्यापार ती करीत होती. रंगून मध्ये तिने बायकोप्रमाणे एक बाई ठेवलेली होती. मा-येइन या तिच्या लग्नाच्या बायकोला तिने रंगूनमध्ये एक बाई ठेवल्याचा संशय होता. एकदा तिने त्या बाईच्या माहितीसाठी रंगूनला तिचा पाठलाग केला. पण तिने आपल्या बायकोला आपल्या ठेवलेल्या बाईचा पत्ता लागून दिला नाही. त्यामुळे रागाच्याभरात तिने बॅटरीचे असिड पिऊन रंगूनमध्ये आत्महत्या केली.

तिने वरील माहितीखेरीज मागच्या जन्मातील आपल्या खुनाचीही तपशीलवार माहिती दिली आहे. ती अशी: एकदा पाचाउंगला आपल्या आईडिलांना भेटण्यासाठी ती सायकलने गेली (पाचाउंग हे खेडे प्याव-ब्वे शहराच्या नैऋत्येला ५ किमी अंतरावर असून ते तिथे मूळगाव. पण प्याव-ब्वेमध्ये ती राहत होती. तिचा एक मित्र व जन्मातील तिचा बाप उ-पे-तिन याचेही मूळ गाव पाचाउंग.

पण त्याच्या दक्षिणेला अर्ध्या कि. मी. वर असलेल्या ओकिंगोनेमध्ये तो राहत होता. ओकिंगोनेमध्येच उ-सेइन-माउंग हा मा-म्यिंत-थेइन या मुलीच्या रूपाने उ-पे-तिन या मित्राच्या पोटी जन्मला) आईवडिलांना भेटून परत येताना ओकिंगोनेला जाणाऱ्या रस्त्याच्या बाजूच्या शेतात उ-पे-तिन व त्याची पत्नी दाव-खिन्-ह्ला (या जन्मातील तिचे आईवडील) वाटाणे व घेवडा यांची पिके काढीत असल्याचे तिला दिसले. (ते सुगीचे दिवस होते) त्यांना ती भेटली. त्यांच्याशी थोडावेळ गप्पा मारून ती परत सायकलने निघाली. ओकिंगोने व प्यावब्बे या गावाच्या मध्यभागी असलेल्या लिगोमा या गावातील एका लग्नाला तिला जावयाचे होते. तिथे तिने आपली हाजरी

लावून  परत प्याव-ब्वेला सायकलने निघाली. गावाबाहेर येताच चार माणसे तिला आडवे आली व तिला त्यांनी सायकलवरून खाली पाडले. नंतर जवळच्या रेल्वेखालच्या ओढ्याजवळ तिला नेले. तिने काकुळतीने त्यांना 'मला मारू नका' म्हणून हात जोडले, त्या बरोबर त्यांनी तिच्या दोन्ही हाताची बोटे तलवारीने तोडली. “त्यामुळेच या जन्मात माझ्या दोन्ही हातांची बोटे जन्मतःच तुटलेली आहेत” असे तिने म्हटले आहे.

तिला हेही आठवते की हात जोडले त्यावेळी बोटात सोन्याची अंगठी होती. मनगटी घड्याळ होते. मनगटात सोन्याचे कडे होते. यानंतरचे मात्र जाणीव नष्ट झाल्यामुळे तिला काही आठवत नाही. पण यानंतर तिचे प्रेत पाहिलेल्या लोकांना तिच्या पाठीत तलवार खुपसल्याचे व शिर घडावेगळे केल्याचे आढळून आले आहे. (त्यांचीच खूण तिच्या पाठीवर व मानेवर या जन्मात जन्मतःच आढळून आली आहे व त्याचा उल्लेख प्रारंभी केला आहे. हा खून चोरीच्या हेतूने केलेला नव्हता. कारण_सायकल नेली नव्हती. मनगटी घड्याळ, सोन्याची अंगठी, सोन्याचे कडे या या वस्तू जशाच्या तशा होत्या. हा खून चार वर्षापूर्वी आत्महत्या केलेल्या तिच्या बायकोच्या आईने (सासूने) आपल्या मुलीच्या मृत्यूचा बदला घेण्यासाठी तिच्यावर धंदेवाईक मारेकरी घातले होते व ही गोष्ट नंतर साक्षी पुराव्यानिशी सिध्द झाली. ब्रह्मदेश ब्रिटिशांपासून स्वतंत्र झाल्यानंतरच्या या काळात तेथील शासन कम्युनिस्टांच्या बंडामुळे शिथिल बनले होते. त्यामुळे पोलीसांनी या खुनाची दखल घेतली नव्हती. पण तेथील लोकांना उ-सेइन-माउंगचे मारेकरी माहित होते. मा-म्यिंत-थेइनला त्यांची नावे आठवत होती, व तिने तसे म्हटलेही आहे.पण तिने ती नावे सांगितले नाहीत.

नंतरच्या काळात तिला ओकिंगोनेहून प्यावब्बे ला तिचा खून झालेल्या मार्गावरूनच शाळेला जावे लागे. खून झालेल्या ठिकाणी येताच ती भीतीने थरथर कापत असे.

ती १९ वर्षांची होईपर्यंत खुनाच्या ठिकाणी येताच हा थरथर कापण्याचा प्रकार चालू होता. तिला आपल्याला स्त्री जन्म मिळाल्याबद्दल फार दुःख वाटत होते. (ती बोलताना ब्रह्मी भाषेतील पुरुषी क्रियापदे वापरी.) मागच्या जन्मी श्रीमंती अनुभवलेल्या

तिला या जन्मी गरीब कुटुंबात जन्म मिळाल्यामुळे व तुटकेल्या बोटांच्या हातांच्या व्यंगामुळे आपल्या जीविताबद्दल ती समाधानी नव्हती. ब्रह्मदेशातील तिच्या पूर्वजन्माचे संशोधन केलेल्या बाई, दाव-हनिन-अये यांनी आपल्या जन्माविषयीची तिची प्रतिक्रिया पुढील शब्दात सांगितली आहे, “माझ्या या जन्मातील दुर्दैवी परिस्थितीला केवळ मीच जबाबदार आहे. दुस-या व्यक्तीला (तिच्या बायकोला) माझ्यामुळे जे भोगावे लागले त्याची परतफेड मी या जन्मातील माझ्या भोगाने केलेली असल्यामुळे मी त्या व्यकीच्या ऋणातून आता मुक्त झाले आहे. पुढच्या जन्मी मला काही भोगावे लागणार नाही” (Reincarnation and Biology- Ian Stevenson, pp. 1200-1215)